20140828160230723

**सन २००८-०९ प्रादेशिक पर्यटन योजनेंतर्गत पुरंदर किल्ला व परिसर विकासासाठी निधी वितरीत करणे व प्रशासकीय मान्यता देणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग,
शासन निर्णय, क्रमांक टिडोसी २००९/१/प्र.क्र.२७/पर्यटन,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक - २१ फेब्रुवारी, २००९

**वाचा:- जिल्हाधिकारी, पुणे यांचे पत्र क्र.निशा-३/पुरंदर किल्ला विकास/का.प्रा./१३१/२००९ दि. ३०.१.०९**

**शासन निर्णय:-**

पुरंदर किल्ला परिसर विकासासाठी डिसेंबर, २००८ च्या अधिवेशनात स्वतंत्ररित्या पुरवणी मागणीद्वारे रुपये ५.०० कोटी इतका निधी अर्थसंकल्पित झालेला आहे. जिल्हाधिकारी, पुणे यांनी संदर्भाधीन पत्रान्वये पुरंदर किल्ल्याच्या ठिकाणी पुढील कामांचे अंदाजपत्रक सादर केले आहे. या शासन निर्णयान्वये जिल्हाधिकारी, पुणे यांना पुरंदर येथील पुढील कामे करण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**(रु.लाखात)**

| अ.क्र. | कामाचे नाव | कार्यान्वयीन यंत्रणा | अंदाजित खर्च | वितरीत करावयाचा निधी |
|---|---|---|---|---|
| | **अ) रस्ते:-** | | | |
| १. | रामा - ६३ ते नारायण पेठ | सार्वजनिक बांधकाम विभाग | ३८.०८ | ३८.०८ |
| २. | नारायणपेठ ते पुरंदर गेट | -"- | १९९.४७ | १९९.४७ |
| ३. | पुरंदर गेट ते संभाजी हॉल | -"- | ५८.५२ | ५८.५२ |
| | **ब) फूटपाथ:-** | | | |
| ४. | संभाजी हॉल ते किल्ला प्रवेशद्वार | -"- | ६३.३७ | ६३.३७ |
| ५. | किल्ला प्रवेशद्वार ते केदारेश्वर मंदिर | -"- | ९२.५६ | ९२.५६ |
| ६. | पुरंदर किल्ला परिसरातील फुटपाथ रस्ते व सौरदिवे | महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण व पारेषण कंपनी | ३८.०० | ३८.०० |
| ७. | स्टोन चेक डॅमचे बांधकाम करणे | वन विभाग | १०.०० | १०.०० |
| | | **एकूण** | **५००.००** | **५००.००** |

प्रादेशिक पर्यटन योजनेंतर्गत सन २००८-०९ मध्ये अर्थसंकल्पीत करण्यात आलेल्या रु. ५.०० कोटी इतक्या रकमेपैकी **पुरंदर येथील कामे वरील तक्त्यात नमूद केलेली कामे करण्याकरिता**

रु.५,००,००,०००/-(रु. पाच कोटी फक्त) इतका निधी जिल्हाधिकारी, पुणे यांना अदा करण्यास शासन खालील अटींच्या अधिन राहून मंजूरी देण्यात येत आहे.

**अटी व शर्ती:-**

१) वितरीत केलेल्या निधीतून खर्च करताना वित्तीय नियमांचे आणि विविध नियमांतर्गत नेमून दिलेल्या कार्यपध्दतीचे पालन करण्यात यावे.

२) कोणत्याही परिस्थितीत मंजूर अनुदानापेक्षा जास्त खर्च होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी. मंजूर अनुदानापेक्षा जादा खर्च झाल्यास त्याची जबाबदारी जिल्हाधिकाऱ्यांवर राहील व जादा खर्चा प्रित्यर्थ जादा अनुदान उपलब्ध करुन दिले जाणार नाही.

३) मंजूर तरतूदीतून करावयाचा खर्च मार्च, २००९ पर्यंत करावा व मंजूर कामे पूर्ण करावीत.

४) ज्या संदर्भात निधी उपलब्ध करुन देण्यात येत आहे त्या प्रत्येक योजनेच्या संदर्भात वित्तीय अधिकाराच्या प्रत्यावर्तनानुसार सक्षम प्रशासकीय व वित्तीय मान्यता घेणे आवश्यक आहे.

५) अशा प्रत्येक योजनेबाबत करावयाच्या बांधकामासंदर्भात अथवा खरेदीबाबत किंवा सेवा पुरवठा कराराबाबत वित्तीय नियमांप्रमाणे आवश्यक ती कार्यपध्दती पाळणे आवश्यक आहे. या संदर्भात शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक-संकीर्ण-१००२/प्र.क्र.१५/कोषा-प्र५, दि. ६ फेब्रुवारी, २००२ मधिल सूचनांचे काटेकोरपणे पालन होईल याची खबरदारी संबंधित अंमलबजावणी यंत्रणेने घ्यावी. तसेच शासन निर्णय वित्त विभाग क्र.बीजीटी-१०.००/प्र.क्र.५६/२०००/वित्तीय सुधारणा दिनांक १०.९.२००१ मधील उपाययोजनांची अंमलबजावणी तंतोतंतपणे करण्यात यावी.

६) उपरोक्त सर्व कामांना यापूर्वी तांत्रिक मान्यता घेतलेली नसल्यास काम सुरु करण्यापूर्वी ती प्राप्त करुन घ्यावी. ज्या प्रस्तावांना तांत्रिक मान्यता देताना काही अटी व शर्ती विहित करण्यात आलेल्या आहेत अशा अटीं व शर्तींची आधी पूर्तता करणे बंधनकारक राहील.

७) रस्त्यांच्या प्रस्तावित कामांच्या प्रकरणांमध्ये सार्वजनिक बांधकाम विभागाच्या नियमावलीचे पालन करणे बंधनकारक राहील.

८) योजनेतर स्वरुपाच्या कामासाठी (देखभाल/दुरुस्ती इ.) सदरची तरतूद उपयोगात आणली जाणार नाही याची दक्षता घ्यावी.

९) सदर कामांपैकी जी कामे तीर्थक्षेत्रांच्या विकासासाठी प्रस्तावित करुन देवस्थान/संस्थेच्या जागेवर करण्यात येणार आहेत अशा कामांसंदर्भात सदर देवस्थान/संस्थेकडून ना-हरकत प्रमाणपत्र प्राप्त करुन घेणे बंधनकारक राहील. तसेच अशा कामाच्या पूर्णत्वानंतर त्या संदर्भातील देखभाल/दुरुस्ती, संबंधित संस्थेने करण्यासंदर्भात जिल्हाधिका-यांनी संबंधित देवस्थान संस्थेबरोबर करारनामा करणे बंधनकारक राहील. अशा प्रकारच्या देखभाल दुरुस्तीकरिता शासनाकडून यापुढे कोणत्याही प्रकारचा निधी उपलब्ध करुन दिला जाणार नाही याची नोंद घेण्यात यावी व तशी अट करारात अंतर्भूत करण्यात यावी. तसेच या कामामुळे निर्माण होणा-या सर्व सुविधा तसेच पर्यटन स्थळ सर्व नागरिकांसाठी खुले रहील अशी अट करारात समाविष्ट करण्यात यावी.

१०) सदर निधीतून होणा-या खर्चातून करावयाच्या कामांची भौतिक प्रगती तसेच निधीतून होणा-या खर्चाची मासिक विवरणपत्रे दर महिन्याच्या १० तारखेपर्यंत शासनास न चुकता सादर करावीत. तसेच काम पूर्ण झाल्यानंतर पूर्णत्वाचा दाखला आणि निधीबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र न चुकता शासनास सादर करण्यात यावे.

११) यासंदर्भात होणाऱ्या खर्चाचा मेळ महालेखापालांच्या कार्यालयाशी घालून त्याबाबतचे विवरणपत्र अर्थसंकल्पीय नियम पुस्तिकेतील नियमांप्रमाणे शासनास सादर करावे.

१२) यासाठी होणारा खर्च हा "३४५२-पर्यटन", मागणी क्र.झेडी-४, क (०१) -पर्यटनासाठी पायाभूत सुविधा, १०१-पर्यटन केंद्रे (०१) पंचवार्षिक योजनांतर्गत योजनाराज्य योजनांतर्गत योजना (०२) (१८) पर्यटन विकासासाठी विविध ठिकाणी मुलभूत सुविधासाठी अनुदान (३४५२ १९५ ८) ३१ सहायक अनुदाने" या लेखाशीर्षाखाली सन २००८-०९ मध्ये डिसेंबर २००८ मध्ये पुरवणी मागणीद्वारे अर्थसंकल्पित केलेल्या व उपलब्ध करुन दिलेल्या निधीतूनच खर्ची भागविण्यात यावा. या प्रकरणी जिल्हा नियोजन अधिकारी, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून संबंधित जिल्हाधिकारी यांना देयकावर प्रतीस्वाक्षरी करण्यासही प्राधिकृत करण्यात येत आहे. जिल्हाधिकारी, पुणे यांनी ही रक्कम कोषागरातून आहरीत करावी आणि त्या संबंधिच्या देयकाचा प्रमाणक क्रमांक, देयकाची रक्कम, कोषागराचे नाव, दिनांक इत्यादी माहिती शासनास सादर करावी.

१३) जिल्हाधिकारी, पुणे यांनी रु. ५.०० कोटी खर्च करुन त्याचा ताळमेळ सादर करावा.

सदर शासन निर्णय मासिक निधी वितरण प्रणालीप्रमाणे विभागास असलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

(आ.बा.डमाळे)
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति,
महालेखापाल, महाराष्ट्र-१, (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई,
महालेखापाल, महाराष्ट्र-२, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), नागपूर,
विभागीय आयुक्त, पुणे
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई,
जिल्हाधिकारी, पुणे
जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, पुणे
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/नागपूर
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई/नागपूर
जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
नियोजन विभाग(का.१४१२), मंत्रालय, मुंबई
वित्त विभाग(का.व्यय-१४/अर्थसं-१०) मंत्रालय, मुंबई
निवड नस्ती, कार्यासन-पर्यटन.

D:\Meher २००९\GR Purandar Killa.doc